# टोळधाडीच्या दहशतीत

लेखिका: **कॅथरीन ए. वेल्च**

चित्रे व सजावट: **लॉरी के. जॉन्सन**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**

# टोळधाडीच्या दहशतीत


लेखिका: **कॅथरीन ए. वेल्च**

चित्रे व सजावट: **लॉरी के. जॉन्सन**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**

हेल्गाने आकाशाकडे पाहिले.

“काहीतरी इकडेच येत आहे,” ती म्हणाली.

“आता घरी जाऊया.”

एरिकने आपला मासे पकडण्याचा गळ

पाण्यातून घाईघाईने बाहेर काढला.

तो फक्त सात वर्षांचा,

म्हणजे हेल्गाहून दोन वर्षांनी लहान होता.

पण हा गवताळ प्रदेश त्याच्या चांगला ओळखीचा होता.

जमीन सपाट होती.

इथे अचानक वादळे येत आणि ती खूप मोठी असत.

“असं आकाश तर मी यापूर्वी

कधीच पाहिलं नाही,” एरिक म्हणाला.

“त्या ढगांमधून काहीतरी चमकतं आहे.”

“मला ते आवडत नाही.” हेल्गा म्हणाली.

“बाबा शहरातून परत आले असतील तर बरं होईल.

हे वादळ खूप भयंकर असेल.”

हेल्गा आणि एरिक पुढे चालत राहिले.

आता मोठ्या पांढऱ्या ढगाचा रंग धुरासारखा काळा झाला होता

आणि तो जवळ येऊ लागला होता.

“हा कसला आवाज आहे?” एरिकने विचारले.

हेल्गा लक्ष देऊन ऐकू लागली.

तिला घूं घूं असा एक विचित्र आवाज ऐकू येत होता.

“लवकर चल, हे बहुधा चक्रीवादळ असेल,” ती म्हणाली.

ते भराभर चालू लागले,

तसा अचानक अंधार पडू लागला.

काही मिनिटांतच दिवसाच्या ऐवजी रात्र वाटू लागली.

आणि घूं घूं असा लाकूड कापल्यासारखा आवाज

आता त्यांच्या डोक्यावर सरकला होता.

मग अचानकच तो ढग खाली येऊ लागला.

गारांसारखे काहीतरी जमिनीवर

आणि त्यांच्या हाता - तोंडावर पडू लागले.

“पळ! पळ!” हेल्गा ओरडली.

त्यांच्या भोवताली अंधार दाटला होता.

त्या आवाजाने कान फाटतील असे वाटत होते.

गडद तपकिरी रंगाचे लहान किडे त्यांच्या केसांत

आणि कपड्यांत शिरले होते.

शेतातून पळता पळता हेल्गा आणि एरिक

कपड्यांना चिकटलेले किडे

ओरबाडून काढत होते.

काही मिनिटांतच

आकाश निरभ्र झाले.

उन्हाळ्यातला सूर्य परत चमकू लागला.

हेल्गा आणि एरिक पळायचे थांबले.

त्यांचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना.

त्यांच्या पायाशी टोळांचा समुद्र पसरला होता

आणि त्यांचे पाय घोट्यापर्यंत त्यात बुडून गेले होते!

सगळीकडे टोळ पसरले होते.

काही उडत होते.

काही उड्या  मारत होते.

मक्याच्या शेतातून ‘कुडुम’ ‘कुडुम’ असा जोराचा आवाज येत होता.

“इकडे बघ!” हेल्गा म्हणाली.

सगळं पीक जमिनीला टेकलं आहे!”

“ते सगळी कणसं खात आहेत!” एरिक किंचाळला.

तेवढ्यात,

दूरवरून त्यांना कसला तरी

मोठा आवाज ऐकू येऊ लागला.

“आईला मदत हवी आहे,” हेल्गा ओरडली.

“चल जाऊया.”

हेल्गा पळत सुटली.

एरिक देखील तिच्यामागे पळत सुटला.

ते मक्याच्या शेतातून सुसाट पळत होते.

यांच्या पायाखाली टोळ चिरडले जात होते.

लवकरच त्यांना आई दिसू लागली.

ती भांडी एकमेकांवर आपटून आवाज करत होती.

“त्यांना कशाचीच भीती दिसत नाही.”

श्रीमती लिंडस्ट्रोम ओरडल्या.

“मला आपली बाग वाचवायला मदत करा.”

तिने आपल्या मुलांच्या हातात काही चादरी आणि पांघरुणे दिली.

हेल्गाने टोमॅटोच्या झाडांवरून

टोळ  झटकून टाकले

आणि चटकन झाडांवर पांघरूण घातले.

पण काही सेकंदांतच

टोळ त्या पांघरुणाखाली घुसले.

“याचा काहीच उपयोग नाही.” हेल्गा म्हणाली.

ते तर चादरींच्याखाली पण जात आहेत.

“आणि आता तर ते तू मला दिलेलं

नवं हिरवं पांघरूण  पण खाताहेत,” एरिक म्हणाला.

“मग तुम्हाला जमतील तितक्या भाज्या तोडून घ्या,”

श्रीमती लिंडस्ट्रोम ओरडून म्हणाल्या.

हेल्गा आणि तिची आई त्यांच्या गवताने बांधलेल्या कच्च्या घराकडे पळाल्या.

घरात पाऊल  टाकल्याबरोबर

श्रीमती लिंडस्ट्रोम जोरात किंचाळल्या.

हेल्गाने खोलीत पहिले आणि तिला मोठा धक्काच बसला.

एखादे पांघरूण घालावे त्याप्रमाणे तिच्या छोट्या बहिणीवर,

एत्ताच्या  अंगावर टोळ बसले होते.

तिची आई पळतच पाळण्याकडे गेली

आणि रडणाऱ्या बाळाला उचलून घेतले

आणि सगळे टोळ झटकून टाकले.

“बाबांना हा कंदील नेऊन दे, लवकर जा,”

तिने हेल्गाला सांगितले.

त्याचवेळी बंदुकीचा एक बार उडवल्याचा आवाज आला.

मक्याच्या शेतात एक तपकिरी रंगाचा ढग दिसू लागला.

हेल्गाला दूरवर त्यांची  घोडागाडी दिसली.

“ते बाबाच आहेत,” ती ओरडली.

“ते बंदुकीने टोळ मारताहेत.”

श्री. लिंडस्ट्रोमनी  सगळे घोडे अंगणात आणले.

“कंदील घेऊन या,” ते ओरडले.

हेल्गा कंदील घेऊन बाबांकडे पळत  निघाली.

ते आता एक चर खणत होते.

त्यांना इतके रागावलेले तिने पूर्वी कधीच पाहिले नव्हते.

“तुझ्या भावाला मदत कर,” ते जोरात म्हणाले.

“जाळण्यासाठी काहीतरी घेऊन ये.”

हेल्गा धावतच एरिक कडे गेली.

कडक तपकिरी किड्यांखाली हात घालून

दोन्ही मुलांनी मिळून

गवत आणि काटक्या गोळा केल्या.

हे काही सोपे काम नव्हते.

टोळ त्यांच्या हातांवर आणि पाठीवर

उड्या  मारतच होते.

पण अखेर, एक तास प्रयत्न करून

त्यांनी तो चर भरून काढला होता.

आता बाबा गवत आणि काटक्या पेटवून

टोळांना त्या आगीत ढकलून देणार होते.

काही वेळ आग धडधडून पेटली होती.

परंतु शेकडो टोळ

त्या चरात उड्या मारू लागले.

लवकरच त्यामुळे आग घुसमटू लागली,

आणि काही मिनिटातच विझून गेली.

हे पाहून कोणाच्याच तोंडून शब्द फुटेना.

मग हेल्गा म्हणाली,

“ते आगीत देखील मरत नाहीत. आता काय करायचे?”

“मलाही काही सुचत नाही,” बाबा म्हणाले.

“आज तरी आपण याहून अधिक काहीच करू शकणार नाही.

आपण जाऊन आधी तुझ्या आईला मदत करूया.”

ते जेव्हा त्यांच्या गवताने बांधलेल्या कच्च्या घरात शिरले,

तेव्हा हेल्गाची आई

बाळाला कडेवर घेऊन उभी होती.

“ते सगळीकडेच आहेत,जमिनीवर आहेत

तसे अंथरुणात देखील आहेत.”

ती काळजीने म्हणाली.

बाबांनी फावड्याने जमिनीवरचे बरेचसे टोळ उचलले.

आणि ते हेल्गा आणि एरिकला म्हणाले,

“चला, आता तुम्ही पण झाडू आणि फावडे घ्या,

आपण सगळे टोळ गोळा करून बाहेर टाकूया.”

जेव्हा त्यांनी शेवटचा टोळ  बाहेर टाकला,

तेव्हा त्यांनी दार आणि खिडकी बंद करून घेतली.

टोळांच्या तडाख्यातून जे थोडेफार अन्न वाचले होते,

ते सर्वांनी मिळून खाऊन घेतले.

मग बाबांनी त्यांच्या शहराच्या भेटीबद्दल सांगितले.

“टोळांनी संपूर्ण परिसर व्यापून टाकला आहे.

वाटेत येईल ते सर्वकाही ते खाऊन टाकत आहेत,

अशी बातमी आहे. ”

बाबांनी आपले ताट बाजूला सारले.

“काय करावे हे कोणालाच समजत नाही.”

त्या रात्री कोणालाच चांगली झोप आली नाही.

हेल्गा बराच वेळ जागीच होती.

टोळ निघून जावेत अशी ती प्रार्थना करत होती.

पण दुसऱ्या दिवशी

टोळ  होते तिथेच होते.

आणि नंतर सगळ्यांनी अंगणात पहिले,

तेव्हा सगळ्या कोंबड्या टोळांच्या गराड्यात

आपला तोल सांभाळत होत्या.

“वेड्या कोंबड्या! अधाशासारख्या,

नको इतके टोळ खाऊन बसल्या आहेत!”

बाबा म्हणाले.

“किती घाण वास सुटला आहे,” एरिक म्हणाला.

बाबांनी विहिरीतून एक बादलीभर पाणी काढले.

“शी...” हेल्गा म्हणाली.

“ते विहिरीत देखील आहेत.”

“आपल्या पाण्यात पण आहेत!” बाबा म्हणाले.

“त्यांनी आपल्यासाठी काहीच ठेवले नाही!”

त्यांनी हेल्गा आणि एरिक दोघांनाही एकेक बादली दिली.

“आता माझ्याबरोबर चला.

आपण नदीवर जाऊया.”

नदीजवळची परिस्थिती देखील तशीच होती.

“हे पहा त्यांनी काय केलंय,” हेल्गा ओरडली.

“पाण्याचा रंग तपकिरी झाला आहे

आणि त्याला घाण वास येतो आहे!

आता आपण काय प्यायचे?”

बाबांनी मान हलवली.

“आपण विहिरीवर परत जाऊया.

त्यातले सगळे टोळ बाहेर काढूया

आणि विहिरीवर झाकण घालूया

म्हणजे त्यात आणखी टोळ पडणार नाहीत.

मग जेव्हा पाऊस येईल,

तेव्हा आपण पावसाचे पाणी बादलीत घेऊया.”

ते परत विहिरीकडे आले.

आणि टोळ आणि त्यांची विष्ठा यामुळे

घाण वास येणारे पाणी

त्यांनी बादल्यांनी बाहेर काढून टाकले.

मग हेल्गाच्या बाबांनी एक सापळा तयार केला.

एक मोठा पत्रा  घेऊन त्यांचे काठ वाकवले.

त्याच्यामागे एक जाळी लावली.

त्याच्याखाली दोन चाके बसवली.

त्यानंतर त्याला एक घोडा जोडला.

आणि मग पत्र्याच्या वर रॉकेल ओतले.

मुलांनी शेतात घोडा फिरवायला मदत केली.

हा सापळा जाऊ लागला

की उड्या मारणारे टोळ जाळीवर पडत.

त्यातून ते पत्र्यावर पडत आणि मरून जात.

परंतु टोळांची संख्या प्रचंड होती.

त्यांच्या शेतात आलेल्या कोट्यवधी टोळांना मारून टाकणे

लिंडस्ट्रोम कुटुंबाला शक्य नव्हते.

आता केवळ एकच आशा उरली होती.

कदाचित टोळांनी काही थोडे पीक तरी फस्त केले नसेल.

पुढील सहा आठवडे

ते दररोज शेतात शोध घेत राहिले.

काही वेळा त्यांचे नशीब चांगले असे.

त्यांना पुरेसे अन्न सापडत असे.

पण बाजारात विकण्याएवढे धान्य काही त्यांना मिळाले नाही.

काही दिवस असेच निघून गेले.

टोळ  जितके अधिक दिवस राहिले,

तितकेच त्यांचे आयुष्य अधिकाधिक कठीण होत गेले.

एक दिवशी सकाळी हेल्गाच्या आईने

घराच्या खिडकीतून बाहेर पाहिले.

“अनेक लोक निघून जात आहेत,” ती म्हणाली.

आणखी एक घोडागाडी निघाली आहे.

“पण ते कुठे जात आहेत?” हेल्गाने विचारले.

“कदाचित पूर्वेकडच्या प्रदेशात त्यांचे नातेवाईक असतील,”

आईने उत्तर दिले.

“आपण पण जाणार का?” हेल्गाने विचारले.

“आपण नाही जाणार,” तिचे वडील म्हणाले.

“आपण हे  शेत पिकवण्यासाठी अनेक वर्षे

खूप काम केले आहे.

आता ते कसे सोडून देणार?”

आकाशाकडे पाहून हात वर करून ते म्हणाले,

“आता हेच आपले घर आहे.

शिवाय आपल्याकडे आता पैसेही नाहीत.

आता स्वीडनला परत देखील जाता येणार नाही.”

पंधरा दिवसांनी

शेतातून जात असताना

बाबा सगळ्यांना म्हणाले,

“आता टोळ  निघून गेले आहेत.

पण त्यांची अंडी अजून जमिनीत आहेत.”

“पण मिनिसोटा प्रांतातल्या कडक थंडीत

ही अंडी टिकणार नाहीत. ती मरून जातील,”

आई म्हणाली.

“कदाचित टिकतीलही,” बाबा म्हणाले.

“पुढल्या वसंत ऋतूत परिस्थिती कदाचित आणखीच वाईट असेल.”

हेल्गाच्या आईने बाळाला जोजवले.

“मग आपण काय करणार?” आई म्हणाली.

आपले १० एकरावरील गव्हाचे नुकसान झाले आहे.

५०० कोबी, शिवाय काकडी, शेंगा, कांदे,

गाजरे आणि बीटच्या पिकाचेही पूर्ण नुकसान झाले आहे.”

“निदान आपल्याला काही दिवस पुरेल

एवढे अन्न तरी आहे,” बाबा म्हणाले.

थोडेफार ओट्स, मका, बटाटे आणि टोमॅटो तरी आहेत.”

आईने बाळाला हेल्गाकडे दिले.

“पण आपल्याकडे पैसे नाहीत,” ती म्हणाली.

“गव्हाचे पीक आपल्याला विकता आले असते.

जनावरांच्या चाऱ्यासाठी आणि

पुढल्या वर्षीच्या बियाणांसाठी आपल्याला पैसे लागतील.

कपडे शिवण्यासाठी कापडही घ्यायला हवे.

मी अगोदरच शक्य तितकी ठिगळे लावली आहेत.

बाबांनी आईचा हात हातात घेतला.

“आता फक्त एकच गोष्ट करता येईल.

मला बाहेर जाऊन काम शोधावे लागेल.”

“नको! नको!” आई म्हणाली.

“आम्हाला इथे एकटे सोडून नका जाऊ.”

“पण मला जावेच लागेल,” बाबांनी समजूत घातली.

“उत्तरेकडच्या प्रदेशात गेलो, तर मला चांगले काम मिळेल.

स्टिल वॉटरच्या लाकडाच्या कारखान्यात कामगार हवे आहेत.”

“आम्ही पण तुमच्याबरोबर येऊ का?” हेल्गाने विचारले.

“नको. तुम्ही इथेच राहा,” ते म्हणाले.

आपण सगळे निघून गेलो, तर आपली जमीन जाईल.

इथल्या कडाक्याच्या थंडीत

आपल्या जनावरांची काळजी घ्यायचं काम तुझं.”

पुढचा एक महिना,

हेल्गाच्या वडिलांनी शिकार करण्यात घालवला,

आणि सर्व मांस मीठ लावून,

वाळवून ठेवण्याचे काम आईने केले.

अखेर बाबांच्या जाण्याचा दिवस उजाडला.

सगळेच दु:खी होते आणि मनातून घाबरलेही होते.

पण ही काही रडत बसण्याची वेळ नव्हती.

“आता आपल्याला हिवाळ्याची तयारी करायला हवी,”

आईने मुलांना सांगितले.

“तुम्ही दोघे आपली हातगाडी घ्या

आणि आठवडाभर फिरून जळणासाठी काटक्या

आणि गाईचे वाळलेले शेण गोळा करून आणा

आणि घराच्या एका कोपऱ्यात ठेवा.

आता काय करायचे ते हेल्गाला माहित होते.

“आता आपण झऱ्यावर जाऊया,”

ती एरिकला म्हणाली.

“तिथे नेहमीच काटक्या सापडतात.”

जाताना वाटेत ते

चरायला गेलेल्या गाईंच्या कळपाचे

वाळलेले शेण शोधत होते.

.

झऱ्यापाशी पोचल्यावर एरिक म्हणाला,

“हे बघ,

सगळे टोळ निघून गेले आहेत.

पाणी आता स्वच्छ आहे.

आता आपण परत एकदा मासे पकडू शकू.”

हेल्गा हसली.

परत एकदा मासे खाता येतील

या विचारानेच ती खुश झाली.

“कदाचित परिस्थिती सुधारेल देखील.”

पुढचे काही आठवडे संथपणे गेले.

जेव्हा हवा चांगली असेल, तेव्हा हेल्गा आणि एरिक

हेल बाईंच्या एक मैल अंतरावर असलेल्या शाळेत जात.

पण लवकरच हिवाळा आला.

हेल्गाला रात्रीची भीती वाटू लागली.

अंधार पडला की

तिला आपल्या बाबांची काळजी वाटे.

लाकडाचा कारखाना ही फार धोक्याची जागा आहे

असे तिला वाटे.

एखादे झाड बाबांच्या अंगावर पडले तर...

त्याने ते मरूनच जातील,

आणि मग त्यांना एकट्यानेच राहावे लागेल.

दोन महिन्यांनी जानेवारी महिन्यात

मोठे हिमवादळ झाले.

सुरुवातीला घराच्या छपरावर गारा तडतडू लागल्या.

जेव्हा पहिल्यांदा टोळ आकाशातून पडू लागले होते

त्याचीच हेल्गाला आठवण झाली.

घरात सर्वजण कोंडाळे करून बसले.

आता बाबा इथे असते तर किती बरे झाले असते

असे हेल्गाला वाटू लागले.

तिला बाबांशिवाय राहण्याचा कंटाळा आला होता.

आणि ती थंडीलाही कंटाळली होती.

सोसाट्याचा वारा सुटला होता.

बर्फाचे वादळ रात्रभर चालू होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी

आईने हेल्गाला हलवून जागे केले.

“उठ, हेल्गा! वादळ थांबले आहे.

आपल्याला शेतावर जायला हवे.”

एरिक बाळाबरोबर घरी राहिला.

कोठारापर्यंत जाण्याच्या वाटेवरचा

बर्फ बाजूला करायला तिने आईला मदत केली.

मग त्यांनी पाणी तापवून

जनावरांच्या पिण्याच्या पाण्याचे

बर्फ झाले होते ते विरघळवले.

हेल्गाला तिच्या बाबांचे सांगणे आठवले,

“आपली जनावरे हिवाळ्यात देखील नीट राहतील

हे पाहण्याची जबाबदारी तुझी.”

पण अनेक आठवडे

हे किडे  शेत फस्त करत राहिले.

जुलै महिना आला

आणि या किड्यांना पंख फुटले.

यावेळी लिंडस्ट्रोम कुटुंबाचे नशीब चांगले होते.

टोळांनी त्यांच्या शेतात

अंडी घातली नाहीत.

पण हिवाळा काही संपतच नव्हता.

अखेर, ३ महिन्यांनी हेल्गाचे बाबा घरी आले.

ते आले तेव्हा

नेमके टोळ अंड्यातून बाहेर पडू लागले होते.

आता काय होणार याची सर्वजण वाट पहात होते.

आता पीक वाचेल अशी सगळ्यांना आशा होती.

.

एक दिवस

हेल्गा आणि एरिक झऱ्यावर होते.

“हे बघ!” आकाशाकडे बोट करून हेल्गा म्हणाली.

त्यांच्या डोक्यावर गडद रंगाच्या झुंडी घोंघावत होत्या.

सूर्य तर दिसतच नव्हता.

सगळे टोळ उडून चालले होते.

ते जसे आले होते तसेच निघून गेले.

## लेखिकेचे टिप्पण

अमेरिकेतील मिनिसोटा प्रांताच्या गवताळ भागात ही काल्पनिक गोष्ट घडते. १८७३ ते १८७७ च्या दरम्यान रॉकी माउंटन्स मधून आलेल्या टोळधाडींनी कॅनडा व अमेरिकेच्या मोंटाना ते टेक्सस या प्रांतांमध्ये धुमाकूळ माजवला होता. मिनिसोटा, डकोटा, कॅन्सस, नेब्रास्का, आयोवा आणि मिसूरी या प्रांतांना याचा मोठाच फटका बसला होता.

काही शेतकऱ्यांची पिके अनेक वर्षे वाया गेली. काहींचे यामुळे कमी-अधिक नुकसान झाले पण केवळ एकाच वर्षी.

यातील सपाट राज्यांमध्ये राहणारे लोक जिद्दी होते. त्यापैकी काही दक्षिणेकडील आणि काही न्यू इंग्लंड भागातील होते. काही स्वीडन, नॉर्वे व जर्मनीतून आलेले होते. टोळधाडीच्या काळात पूर्वेकडे राहणाऱ्या काही नातेवाईकांनी त्यांना मदत केली काहींनी पैसे आणि कपडेही पाठवले. परंतु अनेक शेतकऱ्यांना मदत करण्यासाठी कोणी नातेवाईक नव्हते. अशा लोकांना केवळ कठोर परिश्रम, आणि जिद्द यामुळेच या भयंकर संकटाला तोंड देता आले.

या शेतकऱ्यांना देशातील इतर भागाकडून फारच थोडी मदत मिळाली. सरकारने त्यांना थोडीशी रक्कम आणि बियाणे दिले. पण ते काही पुरेसे नव्हते. बियाणे केवळ काही एकरांतच संपून गेली.

जनावरे विकणे शक्य नव्हते. कारण घोडे आणि गाई शेतातील कामासाठी आणि कुटुंबाच्या कल्याणासाठी गरजेची होती.

टोळधाड नसतानाही गवताळ प्रदेशातील आयुष्य कठीणच होते. झाडी अतिशय कमी होती. म्हणून बहुतेक वेळा घरे मातीच्या विटांची किंवा गवत आणि मातीचा वापर करूनच बांधलेली असत. शक्य असेल तेव्हा गाई-म्हशीच्या शेणाच्या गोवऱ्या जळणासाठी वापरल्या जात. गवताळ प्रदेशातील रहिवाशांना जंगली श्वापदे, साप, चक्रीवादळे, आगी, दुष्काळ, गारपीट,आणि हिमवादळांचाही सामना करावा लागे.

१९३०च्या दशकातही अमेरिकेत अनेक वेळा टोळधाडी आल्या, पण टोळधाडींमुळे होणारे नुकसान आता बरेच कमी होऊ लागले आहे. तथापि, शेतकऱ्यांसाठी टोळधाड हे मोठेच संकट मानले जाते. अनेक लोक यावर उपाय शोधण्यासाठी संशोधन करत आहेत.